. २

20140721124300 7323

**श्रीक्षेत्र हरिहरेश्वर मारळ, लघुपाटबंधारे योजना ता.श्रीवर्धन जि.रायगड येथील पाणी पुरवठा कामासाठी प्रादेशिक पर्यटन योजनेंतर्गत निधी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,
शासन निर्णय, क्रमांक टीडी सी २०१०/२/प्र.क्र.१०३/ पर्यटन,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांकः- ७ एप्रिल, २०१२.

संदर्भ :- शासन निर्णय, क्रमांक टीडी सी २०१०/२/प्र.क्र.१०३/ पर्यटन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक २०/५/२०१०.

**शासन निर्णय :**

प्रादेशिक पर्यटन योजनेतंर्गत सन २०११-१२ साठी रुपये १८०.०० कोटी इतकी तरतूद करण्यात आली होती. त्यापैकी रुपये १३५.०० कोटी इतका निधी डिसेंबर, २०११ अखेर वितरीत करण्यात आला आहे. उर्वरीत रक्कमेपैकी सुधारीत अंदाजात रुपये १५३.०० कोटी प्राप्त झाले होते. रुपये २७.०० कोटी इतका निधी कपात करण्यात आला होता.

सदर रुपये २७.०० कोटी निधी एक विशेष बाब म्हणून वितरीत करण्यास शासनाने मान्यता दिली आहे. त्यामुळे सदर रुपये २७.०० कोटी (रुपये सत्तावीस कोटी ) इतका निधी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास वितरीत केला आहे. श्रीक्षेत्र हरिहरेश्वर मारळ, लघुपाटबंधारे योजना ता.श्रीवर्धन जि.रायगड येथील पाणी पुरवठा कामासाठी प्रादेशिक पर्यटन योजनेंतर्गत संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक २०/०५/२०१० अन्वये रु.१९.१५ कोटी (रुपये एकोणीस कोटी पंधरा लाख ) इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून रु.१० लाक्ष वितरीत केले आहेत. रुपये १९.१५ कोटी (रुपये एकोणीस कोटी पंधरा लाख ) प्रशासकीय मान्यता दिलेल्या रकमेपैकी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास वितरीत केलेल्या रुपये २७.०० कोटी (रुपये सत्तावीस कोटी ) इतक्या निधीतून जिल्हाधिकारी, रायगड यांना रुपये ८.०० कोटी वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

कामांचा तपशिल खालीलप्रमाणे

(रुपये लाखात)

| अ.क्र | जिल्हा | कामाचा तपशिल | अंदाजित रक्कम | वितरीत रक्कम |
|---|---|---|---|---|
| | रायगड | **श्री क्षेत्र हरिहरेश्वर- मारळ पाणीपुरवठा योजना** | | |
| | १ | प्राथमिक कामे | १३.१० | ८००.०० |
| | २ | भू संपादन | ३४.२३ | |
| | २ | मुख्य धरण | १४३६.०७ | |
| | ३ | सांडवा | १५०.९० | |
| | ४ | विमोचक | ८९.०४ | |
| | ५ | इमारती | ५.०० | |
| | ६ | वृक्षारोपन | ०.५० | |
| | ७ | संकीर्ण | ३.४५ | |
| | ८ | व्यवस्थापन | ८.४२ | |
| | ९ | दळणवळण | ३.०० | |
| | १० | १० टक्के आस्थापना खर्च | १७१.२९ | |
| | | | **१९१५.००** | **८००.००** |

महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई यांनी रुपये २७.०० कोटी (रुपये सत्तावीस कोटी ) इतक्या निधीतून रुपये ८.०० कोटी (रुपये आठ कोटी) इतका निधी जिल्हाधिकारी, रायगड यांना उपलब्ध करुन देण्यात यावा.

या योजनेंतर्गत दिनांक २०/०५/२०१० रोजी मंजूर केलेल्या कामांना निधी खर्च करण्यात यावा. सदर रुपये २७.०० कोटी इतका निधी (रुपये सत्तावीस कोटी फक्त) खालील अटी व शर्तीवर महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने जिल्हाधिकारी, रायगड यांना रु.८.०० कोटी (रुपये आठ कोटी) अदा करण्यास शासन याव्दारे मान्यता देत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

२) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास जबाबदारी जिल्हाधिकारी, रायगड यांची राहील व जादा खर्च प्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

३) अशा प्रत्येक योजनेबाबत करावयाच्या बांधकामासंदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेवा पुरवठा कराराबाबत वित्तीय नियमांप्रमाणे आवश्यक ती कार्यपध्दती पाळणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१००२/प्र.क्र.१५/कोषा-प्र५, दि. ६ फेब्रुवारी, २००२ च्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची खबरदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.बीजीटी-१०.००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा दिनांक १०.९.२००१ मधील उपाययोजनांची अंमलबजावणी तंतोतंतपणे करण्यात यावी.

४) तांत्रिक मान्यता विहित स्तरावर घेण्यात यावी.

५) रस्त्यांच्या प्रस्तावित कामांच्या प्रकरणांमध्ये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियमावलीचे पालन करणे बंधनकारक राहील.

६) योजनेतर स्वरुपाच्या कामासाठी (देखभाल/दुरुस्ती इ.) सदरची तरतूद उपयोगात आणली जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

७) सदर कामांपैकी जी कामे तीर्थक्षेत्रांच्या विकासासाठी प्रस्तावित करुन देवस्थान/संस्थेच्या जागेवर करण्यात येणार आहेत अशा कामांसंदर्भात सदर देवस्थान/संस्थेकडून ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच अशा कामाच्या पूर्णत्वानंतर त्या संदर्भातील देखभाल/दुरुस्ती, संबंधित संस्थेने करण्यासंदर्भात जिल्हाधिका-यांनी संबंधित देवस्थान संस्थेबरोबर करारनामा करणे बंधनकारक राहील. अशा प्रकारच्या देखभाल दुरुस्तीकरिता शासनाकडून यापुढे कोणत्याही प्रकारचा निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही याची नोंद घेण्यात यावी व तशी अट करारात अंतर्भूत करण्यात यावी. तसेच या कामामुळे निर्माण होणाऱ्या सर्व सुविधा तसेच पर्यटन स्थळ सर्व नागरिकांसाठी खुले राहील अशी अट करारात समाविष्ट करण्यात यावी.

८) सदर निधीतून होणाऱ्या खर्चातून करावयाच्या कामांची भौतिक प्रगती तसेच निधीतून होणा-या खर्चाची मासिक विवरणपत्रे दर महिन्याच्या १० तारखेपर्यात शासनास न चुकता सादर करावीत. तसेच काम पूर्ण झाल्यानंतर पूर्णत्वाचा दाखला आणि निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्यात यावे.

वर नमूद करण्यात आलेला खर्च हा सन २०११-१२ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मुख्यलेखा शीर्ष **"मागणी क्रमांक झेडड्री-४, ३४५२-पर्यटन, ०१ - पर्यटनासाठी पायाभूत सुविधा,**

**१०१ पर्यटन केंद्रे (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना यांना (०२) (१८) पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणांसाठी मूलभूत सुविधांकरिता अनुदान (३४५२ १९५ ८) ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर)"** या लेखा शिर्षाखाली मंजुर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या सल्ल्याने व सहमतीने नियोजन विभाग अनोपचारिक संदर्भ क्र. ७४ /१४४४ दिनांक २८/०३/२०१२ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. २०१ /२०१२ व्यय-१४ दिनांक ३१/०३/२०१२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(आ.बा.डमाळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**
महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
महालेखापाल, (स्थानिक निकाय लेखापरिक्षा व लेखा), मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई
जिल्हाधिकरी, रायगड
जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई
वित्त विभाग (का.व्यय-१४/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई
अवर सचिव पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग (अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई ,
निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.